अर्थसंकल्प प्राथम्य

**सन २०१५-१६ मधील मंजूर अर्थसंकल्पीत**
**तरतूदीचे वितरण करणेबाबत.**
अवेळी पाऊस व गारपीठ आपदग्रस्त शेतक-यांना कर्जावरील व्याजमाफी **(२४२५ २४५३).**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.अर्थस १०१४ / प्र.क्र.२२७ /२-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :-२७ ऑक्टोबर.२०१५

वाचा:-१. सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.टंचाई ०३१४/प्र.क्र.१९/२ स दि.२६/३/२०१४.
२. सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.गारपीठ ०११५/प्र.क्र.१०६/२- स दि.२६/३ /२०१५ .
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३,दि.१७/४/२०१५
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकिर्ण २०१५/प्र.क्र.३४/कोषा-प्रशा ५,दि.२४/७/२०१५
५. सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.पुरक २०१५/प्र.क्र.१०२/२०१५/१७ स दि.१/८/२०१५

**प्रस्तावना:-**

राज्यातील फेब्रुवारी-मार्च २०१४ मध्ये अवेळी पाऊस व गारपीठमुळे नुकसान झालेल्या शेतक-यांचे पीकाचे झालेले नुकसानीकरीता आपदग्रस्त शेतक-यांना विशेष पॅकेज जाहीर करुन तसेच स्थायी आदेशानुसार मदत उपलब्ध करण्याकरीता महसूल व वनविभाग शासन निर्णय दि. २०.०३.२०१४ निर्गमित करण्यात आला आहे. याच कालावधीसाठी या विभागाचे शासन परिपत्रक टंचाई ०३१४-/प्र.क्र. १९/२-स दि. २६.०३.२०१४ नुसार नुकसान झालेल्या शेतक-यांना पॅकेज मंजूर करण्याबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

३. तसेच राज्यातील नोव्हेंबर व डिसेबंर २०१४ मध्ये अवेळी पाऊस व गारपीठमुळे जीवित व वित्त हानी पोटी आदग्रस्तांना मदत व सवलत महसूल व वनविभाग शासन निर्णय दि. ४.०२.०२०१५ अन्वये घोषित करण्यात आली. तदनंतर या विभागाचे शासन परिपत्रक गारपीठ ०११५/प्र.क्र. १०६/२-स दि. २६.०३.२०१५ नुसार व्याजमाफी करण्यात आली.

उपरोक्त दोन्ही कालावधीतील प्रसंगी आपदग्रस्तांना शासनामार्फत पीक कर्जाचे व्याज भरणे व पिक कर्जाचे पुनर्गठन करणेसाठी एकूण रु. ६० कोटी रकमेची पूरवणी मागणी वित्त विभागाने मंजूर केलेली आहे.

सन २०१५-१६ या चालू आर्थिक वर्षासाठी अवेळी पाऊस व गारपीठ आपदग्रस्त शेतक-यांना कर्जावरील व्याजमाफी योजनेखाली मंजूर अर्थसंकल्पित तरतूदीचे वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१ सन २०१५-१६ या चालू आर्थिक वर्षासाठी अवेळी पाऊस व गारपीठ आपदग्रस्त शेतक-यांना कर्जावरील व्याजमाफी योजनेखाली रु.६००० लाख अर्थसंकल्पित तरतूद मंजूर असून त्याबाबत खालील प्रमाणे निधीचे वितरण करण्याचा निर्णय घेण्यात येत आहे.

या योजनेखाली वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र ३ येथील शासन परिपत्राकामधील सूचनेनुसार परिच्छेद ७ ते १८ या अटींची तसेच या शासन निर्णयाच्या सोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या बाबींची पूर्तता झाल्याने या योजनेखालील मंजूर अर्थसंकल्पित निधीच्या एकूण वार्षिक **तरतूदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत** वितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत असून रु.६००० लाख च्या ७० टक्के प्रमाणे **रु.४२०० लाख (रुपये बेचाळीस कोटी फक्त)** एवढा निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणाली (बीम्स) व्दारे वितरीत करण्यात येत आहे. उर्वरीत निधीच्या वितरणास शासनाची मान्यता प्राप्त झाल्यानंतर निधीचे वितरण करण्यात येईल.

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य कार्यालयाने वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा क्र ४ येथील शासन परिपत्राकामधील सूचनांचे पालन करावे.

२. वरील योजनेवर होणारा खर्च सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा व तो पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा.

**मागणी क्र.व्ही-२**
मुख्य लेखाशिर्ष-२४२५ सहकार
८००- इतर खर्च
(००) इतर खर्च (००)(०२) अवेळी पाऊस व गारपीठ आपदग्रस्त शेतक-यांना कर्जावरील व्याजमाफी (२४२५ २४५३)
३३, अर्थसहाय्य

३. सदरचा निधी वितरीत करण्याकरिता लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना या आदेशाव्दारे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य,पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रकमेचा विनियोग विहीत केलेल्या अटी व शर्तीनुसार करण्यात यावा. तसेच योजनेवर झालेला विकासमंडळ निहाय खर्च व लाभार्थ्यांची संख्या याची माहिती नियोजन विभागाच्या योजना माहिती प्रणाली (MPSIMS) वर दर महिन्याच्या अखेरीस न चुकता भरण्यात यावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने तसेच शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३,दि.१७/४/२०१५अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५१०२७१४४५३२६४०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Shankar Bhujbal
Digitally signed by Ashok Shankar Bhujbal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Shankar Bhujbal
Date: 2015.10.27 14:46:11 +05'30'

**(अ.शं.भुजबळ)**
कक्ष अधिकारी

**प्रति,**

१ सह सचिव (व्यय-२ व अर्थ-१३) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.

२ सह सचिव (कार्या १४३१) नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई.
३ उप सचिव, सामाजिक न्याय विभाग (वि.घ.यो.१), मंत्रालय,मुंबई.
४ उपसचिव (अर्थसंकल्प-१७ स) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई.
५ सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य,पुणे.
६ मा.प्रधान सचिव (सहकार). सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई
७ निवड नस्ती कार्या २ स, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई.